सन २०२१-२२ या वर्षामधील महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM) अंतर्गत National Rural Economic Transformation Project (NRETP) योजनेकरीता अर्थसहाय्य.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासननिर्णयक्रमांकः मजिअ - २०२१/प्र.क्र.६५/योजना-३
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ३१ मार्च, २०२२

वाचा :-

१. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.एनआरएलएम-२०११/प्र.क्र.१९६/ योजना-३, दिनांक १८ जुलै, २०११.
२. केंद्रिय ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.जे-१२०२५/०१/२०२१-आरएल(NRETP__२४), दिनांक २१ मार्च, २०२२.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, एसएसआरएलएम, बेलापूर, नवी मुंबई यांचे पत्र क्र.एमएसआरएलएम/लेखा/८९३/२०२२, दिनांक २३ मार्च, २०२२.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानासाठी National Rural Economic Transformation Project (NRETP) योजनेकरिता संदर्भाधीन क्र.२ अन्वये पहिल्या हप्त्याचा दुसरा टप्पा म्हणून रु.११,९५,०१,०००/- इतका निधी वितरीत केलेला आहे. सदर निधी राज्याच्या एकत्रित निधीमध्ये जमा झालेला आहे. सन २०२१-२२ मध्ये महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM) अंतर्गत सर्वसाधारण (General) प्रवर्गाकरीता सुधारित अंदाजनुसार केंद्र हिस्सा (२५०१ २९०८) याकरिता रु.२९२,२६,०४,०००/- व राज्य हिस्सा (२५०१ २७७५) याकरिता रु.११७,८९,००,०००/- इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे. सदर अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीमधून केंद्र हिस्सा रु.११,९५,०१,०००/- व केंद्र हिस्सा समरुप राज्य हिस्सा रु.७,९६,६७,३३३/- असा एकूण रु.१९,९१,६८,३३३/- इतका निधी वितरित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

सन २०२१-२२ मध्ये महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानाला (MSRLM) सर्वसाधारण प्रवर्ग (GENERAL) National Rural Economic Transformation Project (NRETP) केंद्र हिस्सा

(२५०१ २९०८) याकरिता केलेल्या तरतूदीतून रु.११,९५,०१,०००/- (रुपये अकरा कोटी पंच्चान्नव लाख एक हजार फक्त) व केंद्र हिस्सा समरुप राज्य हिस्सा (२५०१ २७७५) याकरिता केलेल्या तरतूदीतून रु.७,९६,६७,३३३/- (रुपये सात कोटी शहान्नव लाख सदुसष्ट हजार तीनशे तेहतीस फक्त) असा एकूण रु.१९,९१,६८,३३३/- (रुपये एकोणीस कोटी एक्यान्नव लाख अडुसष्ट हजार तीनशे तेहतीस फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (B.D.S) द्वारे महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानास वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर रक्कम उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, बेलापूर, नवी मुंबई यांच्याकडे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून सुपूर्द करण्यात येत आहे.

३. सदर रक्कम रु.११,९५,०१,०००/- चा खर्च "मागणी क्र.एल-३, २५०१ ग्रामविकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६, स्वयंरोजगार कार्यक्रम, १०१, सुवर्णजयंती ग्राम स्वयंरोजगार योजना, (०१) सुवर्णजयंती ग्राम स्वयंरोजगार, (१) (१३)महाराष्ट्र राज्य ग्रामीण उपजीविकाअभियान याअंतर्गत अनुसूचित जमाती व्यतिरिक्त इतर लाभार्थ्यांना वित्तीय सहाय्य (केंद्र हिस्सा) (सर्वसाधारण) (६०%) (कार्यक्रम), ३३,अर्थसहाय्य (२५०१ २९०८)" या लेखाशिर्षाखाली व रु.७,९६,६७,३३३/- चा खर्च “मागणी क्र.एल ३, २५०१, ग्रामविकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६, स्वयंरोजगार कार्यक्रम, १०१, सुवर्णजयंती ग्राम स्वयंरोजगार योजना, (०१) सुवर्णजयंती ग्राम स्वयंरोजगार , (०१) (०५) महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानाच्या अनुसूचित जाती / जमाती व्यतिरिक्त लाभार्थ्यांना अर्थसहाय्य (कार्यक्रम), ३३,अर्थसहाय्य, (२५०१ २७७५)” या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदी मधून भागवावा.

४. हे अनुदान ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आलेले आहे, त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे. अन्यथा ती वित्तीय अनियमितता समजण्यात येईल, याची अमंलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी.

५. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती त्वरीत लेखाधिकारी कार्यासन क्रमांक योजना-२, ग्राम विकास विभागयांचेकडे पाठवावी. १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक, ४) महालेखापाल कार्यालयातील रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र.

६. सदर शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक दिनांक २४ जून, २०२१ अन्वये दिलेल्या केंद्र पुरस्कृत योजनांसाठी निधी तसेच राज्य शासनाचा समरुप हिस्सा प्रशासकीय विभागांने त्यांचे स्तरावर वितरित करण्याच्या प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभागाचा अनौ.संदर्भ क्र.३०८/व्यय-१५, दिनांक ३०.०३.२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३१११०७०२६०२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DILIP BABASAHEB PATIL

Digitally signed by DILIP BABASAHEB PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ab277471707f6c88355be37b70bda72228dfe36fb01c0b5f8152a6d3ad3022fa, pseudonym=E96D61F7FACCEE19B6196702D3E9E4499C95F515, serialNumber=6721ACA60D5973C4D26547269488F4F9D7C98360213C1A8CA7ECCC36B35448FF, cn=DILIP BABASAHEB PATIL
Date: 2022.03.31 11:32:46 +05'30'

( दि. बा. पाटील )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) महालेखापाल (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२) प्रधान सचिव व निवासी आयुक्त (गुंतवणूक व राजशिष्टाचार), महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड),सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
४) उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड),सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
५) जिल्हा कोषागार अधिकारी , ठाणे,
६) उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.
७) नियोजन विभाग (१४१४), मंत्रालय, मुंबई-३२.
८) वित्तविभाग (व्यय-१५) व ( अर्थ-१७) मंत्रालय मुंबई-३२.
९) कार्यासन अधिकारी, वित्त-१, वित्त-७, योजना-२, ग्राम विकास विभाग.
१०) निवड नस्ती.